**यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक येथील ग्रंथालय व मल्टिमिडीया लर्निंग सेंटरच्या इमारत बांधकामासाठी निधी वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन,**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्र.वायएमयु २००९/(१५८/०९)/विशि-२,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक २६ फेब्रुवारी, २०१०.

**वाचा :** १) कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे पत्र क्र.केटी/८५४/२००८/३५६४, दिनांक १५.७.२००८.
२) शासन निर्णय क्र.वायएमयु २००७/८८/(१५२/०७)/विशि-२, दि.२९-३-२००८.
३) शासन निर्णय क्र.वायएमयु २००८/(२७५/०८)/विशि-२, दि.२२-१०-२००८.
४) संचालक, उच्च शिक्षण,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.युएनआय/२००९-१०/ यो.यो/ विशि-१/६८८८, दिनांक १.२.२०१०.

**प्रस्तावना :-** यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक या विद्यापीठामार्फत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना शैक्षणिक सोयी उपलब्ध करुन देण्यासाठी विद्यापीठामध्ये ग्रंथालय व मल्टीमिडीया लर्निंग सेंटरच्या इमारतीचे बांधकामासाठी अंदाजे एकूण रु.९३६.७५ लक्ष एवढा खर्च येणार असून, त्यापैकी ५०% खर्च केंद्र शासनाच्या दूर शिक्षण संसाधन विभागाकडून करण्यात येणार असून, ५०% खर्च राज्य शासनाने करावा. तसेच या विद्यापीठासाठी सन २००७-०८ या आर्थिक वर्षात मंजूर झालेले रु.६०.०० लक्षचे अनुदान या कामासाठी वितरीत करण्याचे विद्यापीठाने गत वर्षी प्रस्तावित केले होते. त्यानुसार सन २००७-०८ या आर्थिक वर्षातील रु.६०.०० लक्ष अनुदान संदर्भाधीन क्र. २ च्या दि.२९ मार्च, २००८ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले आहे व संदर्भाधिन क्र. ३ च्या दि. २२ ऑक्टोंबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये २००८ - ०९ ची आर्थिक वर्षातील रु. ६० लक्ष अनुदान वितरीत करण्यात आलेले आहे.

आता, विद्यापीठाने सन २००९-१० या आर्थिक वर्षामध्ये विद्यापीठ विकासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेले रु.२०.०० लक्ष एवढे अनुदान या कामासाठी वितरीत करण्याचे प्रस्तावित केले आहे. सदर अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** सन २००९-१० या आर्थिक वर्षामध्ये योजनांतर्गत योजना या तरतूदीखाली यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठासाठी रु.२०.०० लक्ष एवढी आर्थिक तरतूद करण्यात आलेली आहे. त्यानुसार सदर विद्यापीठामध्ये ग्रंथालय व मल्टीमिडीया लर्निंग सेंटरच्या इमारत बांधकामाच्या प्रयोजनार्थ रु.२०.०० लक्ष (रुपये वीस लक्ष फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे. विद्यापीठाने याबाबतचे उपयोजना प्रमाणपत्र संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत सादर करावे.

२.	वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना योग्य वेळी सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३.	या प्रस्तावांतर्गत होणारा खर्च मागणी क्र.डब्ल्यू-२ २२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२ विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००)(१६) यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाचा विकास (२२०२ ३५१२) सहाय्यक अनुदाने या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर रक्कम यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठास अदा करण्याची कार्यवाही तात्काळ करावी.

३.	हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५ मे, २००९ मधील भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४ नियम क्रमांक २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४.	हा शासन निर्णय शासनाच्या **www.maharashtra.gov.in** वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००२२६१६१९०२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रा. गो. जाधव )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) कुलगुरु, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक,
४) कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक,
५) सहसंचालक ( उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
९) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१०) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) निवड नस्ती (विशि-२)